**“प्रधानमंत्री कुसुम घटक ब” या योजनेतंर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये अनुसूचित जाती प्रर्वगातील सौर कृषि पंपासाठी महावितरण कंपनीस निधी वितरण करणेबाबत.**
**(लेखाशिर्ष २८१० ०९९२)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३१ मार्च, २०२५.

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दि.२९.०७.२०२४
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र. IELD-३४०११/१८/२०२५-ENERGY-७

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री कुसुम घटक ब या योजनेतंर्गत अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २८१०- नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना,(०१) (०१) मुख्यमंत्री सौर कृषीपंप योजना(कार्यक्रम) (२८१० ०९९२) या लेखाशिर्षाखाली रु.४४४.०६ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१.०४.२०२४, दि.२५.७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. तसेच संदर्भ क्र.३ येथील परिपत्रकान्वये पुरवणी मागणीद्वारे मंजूर रक्कमेच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार या योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वाचा क्र.४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार प्रधानमंत्री कुसुम घटक ब योजनेतंर्गत सौर कृषी पंप आस्थापित करण्यासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित निधीतून (२८१० ०९९२) या लेखाशिर्षाखाली रु.११८.१६८०४४ कोटी इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/

उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१.०४.२०२४,दि.२५.७.२०२४,दि.२९.७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१.०४.२०२४, दि.२५.७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१९६/व्यय-१४, दि.२८/०२/२०२५ अन्वये प्रदान केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११७१००९७८२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.03.31 17:11:03 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विज वितरण कंपनी मर्या, प्रकाशगड, बांद्रा(पूर्व), मुंबई
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-७), मंत्रालय, मुंबई
८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (ऊर्जा-७), मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग